**गोंडवाना विद्यापीठासाठी सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षातील वेतन व वेतनेतर तरतूदी वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्रशिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण - २०११/(१९५/११)/विशि-२

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :११ नोव्हेंबर, २०११.

**पहा** :- १) शासन अधिसूचना, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण २००७/(३२२/०७)/विशि-४, दिनांक २७ सप्टेंबर, दिनांक २७ सप्टेंबर, २०११.

२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण २०१०/(४२५/१०)/विशि-१, दि. ०५.०३.२०११.

**प्रस्तावना** :

राज्यात गोंडवाना विद्यापिठ नव्याने स्थापन झाले असून शासन अधिसूचना, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण २००७/(३२२/०७)/विशि-४, दिनांक २७ सप्टेंबर, २०११ अन्वये गोंडवाना विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधीची अधिसूचना निर्गमित करण्यात आली आहे. गोंडवाना विद्यापीठासाठी शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. संकीर्ण २०१०/(४२५/१०)/विशि-१, दि. ०५.०३.२०११ अन्वये एकूण ६ सांविधानिक पदे मंजूर करण्यात आली आहेत. गोंडवाना विद्यापीठ हे नवीन विद्यापीठ असून सदर विद्यापीठाचे वेतनावरील खर्च तसेच उद्‌घाटन करणे, फर्निचर व अनुषंगिक बाबींवरील तातडीचा खर्च भागविण्यासाठी तरतूद उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :- गोंडवाना विद्यापीठ हे नवीन विद्यापीठ असून सदर विद्यापीठाचे वेतनावरील खर्च तसेच उद्‌घाटन करणे, फर्निचर व अनुषंगिक बाबींवरील तातडीचा खर्च भागविण्यासाठी गोंडवाना विद्यापीठासाठी सन २०११-२०१२ च्या आर्थिक वर्षात **३१- सहायक अनुदान- वेतन अंतर्गत रुपये ५०.०० लक्ष व ३६- सहायक अनुदान- वेतनेतर** अंतर्गत रुपये ८०.०० लक्ष अशी एकूण रुपये १३०.०० लक्ष तरतूद उपलब्ध आहे. सदर तरतूदीपैकी अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध असलेल्या तरतूदीच्या मर्यादेत वेतनासाठी रुपये ३५.०० लक्ष (रुपये पस्तीस लक्ष फक्त) तसेच वेतनेतरसाठी रुपये ४०.०० लक्ष (रुपये चाळीस लक्ष) अशी एकूण रुपये ७५.०० लक्ष (रुपये पंच्याहत्तर लक्ष फक्त) तरतूद खर्च करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

सदरहू मंजूर झालेली तरतुद खर्च करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate) संचालक (उच्च शिक्षण), पुणे यांचेमार्फत विहित वेळेत सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर खर्च " मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण- १०२, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (२२) गोंडवाना विद्यापीठाची स्थापना (२२०२ एच-५८१) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) व ३६- सहाय्यक अनुदाने (वेतन) " या लेखाशिर्षाखाली खर्च घालण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४-नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये-आणि वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अंदाज २०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक २१.०९.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११११११६१११२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( रा. गो. जाधव )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
४) कुलगुरु, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली
५) कुलसचिव, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली/पुणे/नागपूर
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक. मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,